**“मेक इन महाराष्ट्र” या उपक्रमांतर्गत राज्यातील उद्योगांना लागणारे विविध परवाने/ संमती यांची संख्या व त्यासाठी लागणारा कालावधी कमी करण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उप समिती स्थापन करणे बाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक- मेइम- २०१४ / प्र.क्र. ८८/उद्योग-८**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक- ८/१/ २०१५

**प्रस्तावना:-**

राज्यात “मेक इन महाराष्ट्र” हा महत्त्वांकाक्षी उपक्रम हाती घेऊन उत्पादन उद्योगांचा जलद गतीने विकास करणे, जलद निर्णय प्रक्रिया राबविणे, प्रचलित कार्यपद्धतीत सुधारणा करणे, अनावश्यक परवाने व त्यासाठी लागणारा कालावधी कमी करणे, कामगार कायद्यात केलेल्या सुधारणा करण्याच्या अनुषंगाने नवीन धोरण विकसित करणे या बाबी शासनाच्या विचाराधीन होत्या. त्यास अनुसरून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

“मेक इन महाराष्ट्र” हा महत्त्वाकांक्षी उपक्रम राज्यात यशस्वीरित्या राबविण्यासाठी राज्यात गुंतवणूक करण्यास इच्छूक असलेल्या गुंतवणूकदारांना उद्योग सुरु करण्यास सर्वसाधारणपणे आवश्यक असलेली परवाने, संमती जलद गतीने देणे व सक्षम प्राधिकाऱ्यांमार्फत मान्यता/परवाने/संमती मिळविण्याची कार्यपध्दती सहजसाध्य व सुलभ व्हावी यासाठी सर्व विभागांनी त्यांच्याशी निगडीत विविध प्रक्रिया २५ टक्के व लागणारा कालावधी १० टक्के पर्यंत कमी करण्यात यावेत असे निर्देश देण्यात आले आहेत. याकरिता संबंधित मंत्रालयीन विभागांनी अशा प्रक्रिया कमी करणे त्यात सुधारणा करणे उद्योगांना तपासणी भेटीऐवजी आवश्यकतेनुसार स्वयं-प्रमाणीकरणाच्या आधारे मान्यता देणे , ऑनलाईन सुविधा देणे , त्यासाठी प्रचलित अधिनियम/ नियमांमध्ये दुरूस्त्या करणे आवश्यक असल्यास तसे प्रस्ताव प्राथम्याने हाताळणे आवश्यक आहे. “मेक इन महाराष्ट्र” उपक्रम प्रत्यक्षात साकार करण्यासाठी व त्यास प्रशासकीय गती देण्याकरीता या उपक्रमांतर्गत केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे व त्याकरिता धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उप समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अ) मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील मंत्रिमंडळ उप समिती -**

| | | |
|---|---|---|
| १) मा. मुख्यमंत्री | - | अध्यक्ष |
| २) मा. मंत्री (उद्योग) | - | सदस्य |
| ३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) | - | सदस्य |
| ३) मा. मुख्य सचिव | - | सदस्य |
| ३) प्रधान सचिव (उद्योग) | - | सदस्य सचिव |
| ४) आमंत्रित | - | आवश्यकतेनुसार संबंधित विभागाचे मंत्री |
| ५) आमंत्रित | - | आवश्यकतेनुसार संबंधित विभागाचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव |

**ब) समितीची कार्यकक्षा व व्याप्ती:-**

१) मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील सदर समिती प्रत्येक महिन्यात एकदा अथवा आवश्यकतेनुसार बैठक घेईल व त्यात उद्योगांना लागणाऱ्या विविध परवाने/ संमती यांच्या संख्येत कपात करणे, प्रचलित प्रक्रिया सुलभ व सहजसाध्य करण्यासाठी सुधारणा सुचविणे व त्यासाठी लागणारा कालावधी कमी करणेसंदर्भात धोरणात्मक निर्णय घेणे व याबाबत विविध विभागांनी केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे.

२) उद्योगांना आवश्यक विविध परवाने / मान्यता, प्रक्रियांचे संगणकीकरणासंदर्भात विविध विभागामार्फत केलेल्या कार्यवाहीचा व प्रगतीचा आढावा घेणे. (Status of Digitalization of Clearances)

३) शक्तीप्रदान समितीमार्फत विशिष्ठ प्रकरणी शासन स्तरावर धोरणात्मक निर्णय, अधिनियमात/ नियमात सुधारणा करणे, काही प्रक्रिया वगळणे इ. बाबत शिफारस करण्यात आलेल्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेणे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०१०८१५०६३५१८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.01.08 15:28:44 +05'30'

**(संजय इंगळे)**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव
२) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
३) आयुक्त, मुंबई महानगरपालिका
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
६) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.

**प्रतिलिपी,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.